पुनर्रचित राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान (**RGSA**)
योजनेअंतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता
दुसरा हप्ता म्हणून केंद्र शासनाकडून प्राप्त
झालेला केंद्र हिश्याचा निधी व त्याच्या समरुप
राज्य हिश्याचा निधी वितरीत करण्याबाबत.
सर्वसाधारण घटक (**Minor Head 101**)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः राग्रास्व- २०२४/प्र.क्र.५५/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२४

वाचा :-

१. ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र. : राग्रास्वअ- २०२२/प्र.क्र.४०/आस्था-१५, दि.१६.०९.२०२२.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. : अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३ व दि.०५.०२.२०२४.
३. ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र. : राग्रास्वअ- २०२२/प्र.क्र.६/आस्था-१५, दि. १३.०३.२०२३
४. ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र. : राग्रास्वअ- २०२२ /प्र.क्र.५३/आस्था-१५, दि. २१.०३.२०२३.
५. ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र. : राग्रास्वअ- २०२२ /प्र.क्र.५३/०१/आस्था-१५, दि. ०५.०७.२०२३.
६. ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र. : राग्रास्वअ- २०२२ /प्र.क्र.५३/०२/आस्था-१५, दि. ०५.०७.२०२३.
७. पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र. के-११०११/७/२०२३-सीबी, दि.०६.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने पंचायती राज व्यवस्थेच्या बळकटीकरणासाठी **"राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान"** या योजनेचे पुनर्गठन करुन **"राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान"** ही योजना सन २०१८-१९ ते सन २०२१-२२ या कालावधीत राबविली आहे. सदर योजनेचा मुळ ढाचा न बदलता सन २०२२-२३ पासून **"पुनर्रचित राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान"** ही योजना ग्रामविकास विभागाच्या वाचा येथील क्र. १ च्या शासन निर्णयान्वये लागू केली आहे. सदर योजना केंद्र शासन पुरस्कृत असून या योजनेच्या निधीचे प्रमाण हे केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०% असे आहे.

२. सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता पुनर्रचित राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान योजनेसाठी रु.४०६.१२ कोटी (रुपये चारशे सहा कोटी बारा लक्ष फक्त) एवढ्या रकमेच्या वार्षिक कृती आराखड्यास केंद्र शासनाने मंजूरी दिलेली आहे. त्या अनुषंगाने पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार यांच्या वाचा येथील क्र.७ च्या पत्रान्वये, पुनर्रचित राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान योजनेंतर्गत राज्यास सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी दुसरा हप्ता म्हणून सर्वसाधारण (General) (Minor Head 101) घटकाकरीता केंद्र हिस्सा म्हणून (६०%) रु.८१०.०० लक्ष (रुपये आठ कोटी दहा लक्ष फक्त) इतका निधी प्राप्त झाला आहे. सदर निधीच्या समरुप राज्य हिस्सा म्हणून (४०%) रु.५४०.०० लक्ष (रुपये पाच कोटी चाळीस लक्ष फक्त) असा एकुण रु.१३५०.०० लक्ष (रुपये तेरा कोटी पंन्नास लक्ष फक्त) इतका निधी दुसरा हप्ता म्हणून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

पुनर्रचित राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान (RGSA) (६०:४०) या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी केंद्र हिश्श्याचा दुसरा हप्ता म्हणून सर्वसाधारण (General) (Minor Head 101) घटकासाठी केंद्र हिस्सा म्हणून (६०%) रु.८१०.०० लक्ष (रुपये आठ कोटी दहा लक्ष फक्त) इतका निधी प्राप्त झाला आहे. सदर निधीच्या समरुप राज्य हिस्सा म्हणून (४०%) रु.५४०.०० लक्ष (रुपये पाच कोटी चाळीस लक्ष फक्त) असा एकुण रु.१३५०.०० लक्ष (रुपये तेरा कोटी पंन्नास लक्ष फक्त) इतका निधी State Nodal Officer - संचालक, पंचायत राज, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. वाचा येथील वाचा येथील क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये संचालक, पंचायत राज, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात आलेले आहे. तथापि, अद्यापही आहरण व संवितरण सांकेतांक प्राप्त झालेला नसल्याने उपरोक्त प्रमाणे वितरित करावयाचा निधी विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. उप आयुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. उप आयुक्त (आस्थापना) यांनी संबंधित State Nodal Officer - संचालक, पंचायत राज, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना अनुदान वितरित करावे. State Nodal Officer - संचालक, पंचायत राज, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी जिल्हा परिषदांना सदर निधी मंजूर वार्षिक कृती आराखडयाप्रमाणे वितरित करावा.

३. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून होणारा खर्च अत्यंत काटकसरीने केला जाईल याबाबत संचालक, पंचायत राज, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी व सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी. संचालक, पंचायत राज, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना या योजनेसाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार संबंधितांना वितरित करावा आणि वितरित केलेल्या निधीचा उपयोग योग्य प्रकारे होतो किंवा नाही याबाबत खातरजमा करुन होणाऱ्या खर्चावर नियंत्रण ठेवावे. निश्चित केलेली उद्दिष्ट व साध्य यासाठी झालेल्या खर्चाचा आढावा घेऊन शासनास तात्काळ अहवाल पाठवावा व खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्रदेखील सादर करावे.

४. या अनुदानातून State Nodal Officer संचालक, पंचायत राज, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासणीचे अधिकार महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई आणि महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र - २, नागपूर यांना राहतील व त्यांना त्यांचे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित कार्यालय संपूर्ण सहकार्य करेल.

५. या शासन निर्णयाव्दारे मंजूर केलेल्या अनुदानातून होणारा खर्च मागणी क्र.एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन, ००, १०१ आयुक्त, (०३) पुनर्रचित राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, (०३)(०१) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण, (केंद्र हिस्सा ६०%), (कार्यक्रम), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) लेखाशिर्ष क्र. २०५३A५३८ व (०३)(०२) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण, (राज्य हिस्सा ४०%), (कार्यक्रम), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) लेखाशिर्ष क्र. २०५३A५४७ या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ मध्ये मंजूर असलेल्या तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय दि. १५.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग ३ मधील अ.क्र.४ परि.२७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३ व दि.०५.०२.२०२४ मधील सूचनांना अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४१४२९४९२६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

POPAT D. DESHMUKH

Digitally signed by POPAT D. DESHMUKH
DN: cn=POPAT D. DESHMUKH, o=Rural Development Department, ou, email=P.d.deshmukh@nic.in, c=IN
Date: 2024.03.14 17:54:00 +05'30'

(पो. द. देशमुख)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता महाराष्ट्र विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन मुंबई.
५. मा.विधान सभा/ मा.विधान परिषद सदस्य (सर्व)
६. मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
७. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव
८. मा.अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक
९. मा.अप्पर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक
१०. मा.प्रधान सचिव (ग्राम विकास) यांचे स्वीय सहायक
११. मा.प्रधान सचिव (आदिवासी विकास) यांचे स्वीय सहायक
१२. मा. प्रधान सचिव (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांचे स्वीय सहायक
१३. मा.प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान) यांचे स्वीय सहायक
१४. विभागीय आयुक्त, पुणे.
१५. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे
१६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), बाणेर रोड, पुणे
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१८. उप सचिव (सर्व), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
१९. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थसंकल्प-१७) मंत्रालय, मुंबई-३२
२०. नियोजन विभाग (का.क्र.१४४४), मंत्रालय, मुंबई-३२.
२१. कार्यासन (वित्त-१), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
२२. निवडनस्ती (आस्था-१५)